**प्रादेशिक परिवहन कार्यालयाच्या दैनंदिन कामकाजासाठी डिजीटल फ्रँकिंग मशीन खरेदी करण्यास व त्यापोटी येणा-या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०२२३/प्र.क्र.५०/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : २६ मार्च, २०२४

**वाचा : -**

१) उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग- ४, दि.०१.१२.२०१६
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दि. १७.४.२०१५.
३) गृह विभाग, शासन निर्णय क्र.एमव्हिडी ०२२३/ प्र.क्र.५०/परि.-४, दि.१३.०२.२०२३.
४) परिवहन आयुक्त,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्र.पआका/का.१०/रवका/फ्रँकिंग मशीन/ मुंबई(मध्य)/२०२२/जा.क्र. ७०३, दि.१६.०१.२०२३, व २०२४/जा.क्र.३४४६, दि.१८.०३.२०२४.

**प्रस्तावना :-**

प्रादेशिक परिवहन कार्यालय, मुंबई (मध्य) या कार्यालयांचे जावक टपाल पाठविणे या कार्यालयातील दैंनदिन कार्यालयीन टपाल पाठविण्याकरिता नवीन व्हर्जन २ डीजीटल फ्रैंकिंग मशीन खरेदी देयकाच्या प्रस्तावास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याचे शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रादेशिक परिवहन कार्यालय, मुंबई (मध्य) या कार्यालयातील दैंनदिन कार्यालयीन टपाल पाठविण्याकरिता नवीन व्हर्जन २ डीजीटल फ्रैंकिंग मशीन खरेदी देयक रूपये १,२०,३३६/- (अक्षरी रूपये एक लाख वीस हजार तीनशे छत्तीस फक्त) इतक्या रक्कमेच्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी येणारा खर्च " मागणी क्र. बी-३, मुख्य लेखाशिर्ष २०४१ वाहनावरील कर, (०२) प्रादेशिक कार्यालये (योजनेत्तर) दत्तमत, (२०४१००३६) १३ कार्यालयीन खर्च " या लेखाशीर्षाखाली सन २०२३-२०२४ या आर्थिक वर्षात उपलब्ध असणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८ भाग पहिला,उपविभाग-चार, अनुक्रमांक ७ अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारानुसार सदरचे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२६१४३७४१०८२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BHARAT RAMCHANDRA LANGHI

Digitally signed by BHARAT RAMCHANDRA LANGHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559, postalCode=400032,
st=Maharashtra,
serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=BHARAT RAMCHANDRA LANGHI
Date: 2024.03.26 14:48:39 +05'30'

**( भरत रा. लांघी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव
३) महालेखापाल (लेखापरीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
४) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
५) परिवहन उप आयुक्त (निरीक्षण/लेखा) परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई
६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७) निवासी लेखा अधिकारी, मुंबई
८) कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवड नस्ती (परिवहन-४)